

# महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग,**
मुख्य इमारत, पहिला मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दूरध्वनी क्र.०२२-२२०४८२४७ Email ID : deskkh२-rfd@mah.gov.in

क्र:-गौखनि-४१/०८२०/प्र.क्र.२०९/ख-२ दिनांक : २३ ऑगस्ट, २०२४

**विषय : गौण खनिज-परभणी**

सन २०१४-२०१५ करीता मौजे दुसलगांव, ता. गंगाखेड, जि. परभणी येथील रेतीघाटातून उत्खनन करता न आलेल्या रेतीचा परतावा मिळणेबाबत.

- मे. पंडित ट्रान्सपोर्ट मार्फत श्री. रवीकांत कुंडलीक पंडित, रा. पोखरणी, ता. गंगाखेड, जि. परभणी

**शासन ज्ञापन:**

जिल्हाधिकारी, परभणी यांचे पत्र क्र.२०१५/महसूल/गौ.ख./प्र.क्र.३९६, दिनांक २१.१०.२०२१ रोजीच्या पत्राच्या अनुषंगाने कळविण्यात येते की, सन २०१४-२०१५ करीता मौजे दुसलगांव, ता. गंगाखेड, जि. परभणी या वाळूगटाकरीता झालेल्या लिलावात मे. पंडित ट्रान्सपोर्ट मार्फत श्री. रवीकांत कुंडलीक पंडित, रा. पोखरणी, ता. गंगाखेड, जि. परभणी यांनी रक्कम रू.०१,८२,६७,५२०/- एवढ्या सर्वोच्च बोलीस मंजूर करण्यात आला.

०२. उत्खनन सुरू असताना लिलावधारक यांच्याविरुध्द तहसिलदार, गंगाखेड यांनी दंडात्मक आदेश पारीत केले. लिलावधारक यांनी सदर आदेश उपविभागीय अधिकारी, गंगाखेड यांच्याकडे अव्हानित करण्यात आले असता, उप विभागीय अधिकारी, गंगाखेड यांनी तहसिलदार यांचे आदेश कायम केले. उपविभागीय अधिकारी, गंगाखेड यांनी दिनांक २९.०७.२०१६ रोजीचे आदेश अपर जिल्हाधिकारी, परभणी यांच्याकडे आव्हानित करण्यात आले असता, अपर जिल्हाधिकारी, परभणी यानी उप विभागीय अधिकारी, गंगाखेड यांचे आदेश कायम ठेवले. तदनंतर लिलावधारक यांनी अपर जिल्हाधिकारी, परभणी यांचे आदेश अपर विभागीय अधिकारी, छत्रपती संभाजीनगर यांच्याकडे अव्हानित करण्यात आले असता, अपर विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर यांनी दिनांक २४.०१.२०१९ च्या आदेशान्वये अपर जिल्हाधिकारी, परभणी यांचे आदेश कायम केले.

०३. तथापि, लिलावधारक यांनी अपर विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर यांच्याकडे पुनर्विलोकन अर्ज दाखल करण्यात आला असता, दिनांक ०५.०२.२०२० च्या आदेशान्वये लिलावधारक यांचा पुनर्विलोकन अर्ज मंजूर करण्यात येवून त्यांचा दिनांक ०४.१०.२०१९ रोजीचे आदेश व अपर जिल्हाधिकारी, परभणी यांचे दिनांक २४.०१.२०१९ चे आदेश रद्द केले आहेत. तदनंतर लिलावधरकाने वाळू गटातून उत्खनन करता न आलेल्या रेतीच्या परिमाणाच्या अनुषंगाने रकम परत करण्याची विनंतीच्या अनुषंगाने जिल्हाधिकारी, परभणी यांनी प्रस्ताव सादर करण्यात आला असता, अपर विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर याचे दिनांक ०५.०२.२०२० च्या आदेशाचे महाराष्ट्र जमीन महसूल संहिता, १९६६ अन्वये पुनरीक्षण करण्याची विनंती केली असता, मा.मंत्री (महसूल) यांनी दिनांक २०.०७.२०२१ रोजी अपर विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर यांच्या निर्णयाच्या अनुषंगाने लिलावधारकास प्रमाणशीर परताव्याच्या रक्कमे संबंधीचा प्रस्ताव जिल्हाधिकारी, परभणी

यांनी विभागाकडे सादर केला आहे.

०२. मा.मंत्री(महसूल) यांचे आदेश, लिलावधारक यांनी केलेली विंनती, जिल्हाधिकारी,परभणी यांनी सादर केलेला प्रस्ताव तसेच लिलावधारकाने रकमांचा भरणा विहित कालावधीत भरणा न करणे. याबाबी विचारात घेवून लिलावधारक यांनी सर्वोच्च बोलीस मंजूर केलेल्या रकमेतून १/४ रक्कम जप्त करून उर्वरीत रक्कम रू.०१,२१,०६,५१२/- (रू.एक कोटी एकवीस लाख सहा हजार पाचशे बारा फक्त) लिलावधारक मे. पंडित ट्रान्सपोर्ट तर्फे प्रो.प्रा. श्री. रविकांत कुंडलीक पंडीत, रा. पोखरणी, ता. गंगाखेड, जि. परभणी यांना परत करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे.

०३. सबब मे. पंडित ट्रान्सपोर्ट तर्फे प्रो.प्रा. श्री. रविकांत कुंडलीक पंडीत, रा. पोखरणी, ता. गंगाखेड, जि. परभणी यांना सन २०१४-२०१५ करीता मौजे दुसलगांव, ता. गंगाखेड, जि.परभणी मधून उत्खनन करता न आलेल्या प्रमाणशीर परताव्याची रक्कम वाळू/रेती निर्गती धोरणानुसार परिगणीत करण्यात आली असून त्यानुसार परताव्याची रक्कम रू.०१,२१,०६,५१२/- (रू.एक कोटी एकवीस लाख सहा हजार पाचशे बारा फक्त), त्यांनी लिलावाची रक्कम प्रत्यक्षात शासनाकडे जमा केल्याची व यापूर्वी ही रक्कम अदा केलेली नाही याची खातरजमा करुन घेण्याच्या अटीवर अदा करण्यास शासन ज्ञापनाद्वारे मान्यता देण्यात येत आहे .

०४. या बाबीवर होणारा खर्च चालू वर्षाकरीता लेखाशिर्ष "०८५३-अलोहयुक्त खाणी व धातुशास्त्रीय उद्योग "१०२-खनिजबाबत सवलत फी व स्वामित्वधन, ९००, अलोहयुक्त खाणकाम व धातुशास्त्रीय उद्योग-वजा परतावे (००) (०१) वजा परतावे (०८५३ ००८६) खाली वजा परतावे देण्याकरीता करण्यात आलेल्या उपलब्ध अंदाजपत्रकीय तरतूदीमधून खर्ची टाकून भागविण्यात यावा.

०५. सदर शासन ज्ञापन वित्त विभागाच्या क्र.अनौ.संक्र.१५५/२०२४/व्यय-९,दि.२०.०३.२०२४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०८२३१७०४१५४६१९ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

SADANAND GOVIND MOHITE

Digitally signed by SADANAND GOVIND MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT, 2.5.4.20=9bd008875b6a3a9fddad3e55fe0328df13a27221cb2bbc67abd0155f914efc01, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6590E2301450C474B246074049174C79201BCAD9E5EB15E8F21C282EAEFEDA38, cn=SADANAND GOVIND MOHITE
Date: 2024.08.23 17:19:59 +05'30'

**( सदानंद गो. मोहिते )**
**कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग**

**प्रति,**

**जिल्हाधिकारी, परभणी**

**प्रत:**

१) विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर.
२) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, नागपूर.
३) प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, नागपूर.
४) जिल्हा कोषागार अधिकारी, परभणी.
५) निवडनस्ती “ख-२” कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग, मुंबई -४०० ३२.